सर्व कायदेशीर अथवा न्यायालयीन विवादासाठी या आदेशाचा इंग्रजी अनुवाद अधिग्राह्य धरण्यात येईल.

**<u>काम सुरु करण्यास व वृक्ष तोडण्यास परवानगी देण्याबाबत.</u>**

**कर्नाळा पक्षी अभयारण्यातून जाणारा राष्ट्रीय महामार्ग क्र.१७ चे मजबुतीकरण, रुंदीकरण व दुरुस्ती करण्यासाठी १.६५ हेक्टर राखीव वनजमिन वळतीकरणाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन आदेश क्रमांकः एफएलडी-१३१३/प्र.क्र.१४१/फ-१०**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक: १५/१२/२०१६

<u>वाचा:-</u>

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१७/एनसी/II/आयडी-(५०)/२७५८/१२-१३, दिनांक २८/०३/२०१३.

२) महाराष्ट्र शासन, महसूल व वन विभागाचे पत्र समक्रमांक, दिनांक २७/०६/२०१३.

३) पर्यावरण, वन व जलवायु परिवर्तन मंत्रालय, क्षेत्रिय कार्यालय, भारत सरकार, भोपाळ यांचे पत्र क्र.६-एमएचबी-४४/२०१३-बीएचओ/५७६, दिनांक २३/०६/२०१६.

४) पर्यावरण, वन व जलवायु परिवर्तन मंत्रालय, क्षेत्रिय कार्यालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.एफ नंबर-११-३०६/२०१४/एफसी, दिनांक ०७/०५/२०१५.

५) महाराष्ट्र शासन परिपत्रक क्र.एफएलडी-२०१५/प्र.क्र.७७/फ-१०, दिनांक ०१/०७/२०१५.

६) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक व केंद्रस्थ अधिकारी, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१७/नोसेल/आरएस-II/आयडी-१२२११/(५०)/१५५९/१६-१७,दिनांक २३/११/२०१६.

<u>आदेश :-</u>

ज्याअर्थी, प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी मुख्य व्यवस्थापक (तांत्रिक) व प्रकल्प संचालक, भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण, पीआययु, चिंचपाडा-कळंबोली बायपास रोड, पनवेल यांच्याकडून प्राप्त झालेला, कर्नाळा पक्षी अभयारण्यातून जाणारा राष्ट्रीय महामार्ग क्र.१७ चे मजबुतीकरण, रुंदीकरण व दुरुस्ती करण्यासाठी १.६५ हेक्टर राखीव वनजमिन वळती करण्याचा प्रस्ताव राज्य शासनास उपरोक्त अ.क्र.१ येथील पत्रानुसार सादर केला होता;

आणि ज्याअर्थी, महाराष्ट्र शासनाने वरील अ.क्र.२ अन्वये या प्रस्तावाची काळजीपूर्वक छाननी केल्यानंतर वन (संवर्धन) अधिनियम, १९८० च्या कलम-२ अन्वये १.६५ हेक्टर वनजमिन वळती करण्याची भारत सरकारला शिफारस केली आहे;

आणि ज्याअर्थी, राष्ट्रीय वन्यजीव मंडळाने दिनांक ०२/०६/२०१५ रोजी झालेल्या ३४ व्या बैठकीत प्रस्तावास शिफारस केली आहे;

आणि ज्याअर्थी, रिट याचिका क्र.२०२/१९९५ प्रकरणी मा.सर्वोच्च न्यायालयाने दिनांक ०५/१०/२०१५ रोजी पारीत केलेल्या आदेशामध्ये, ज्या प्रकल्पांच्या अंमलबजावणीमुळे राष्ट्रीय उद्याने/ अभयारण्यांचे क्षेत्र बाधित होईल किंवा त्यांच्या सीमाक्षेत्रात बदल होईल, अश्या प्रकल्पांच्या अंमलबजावणीकरीता राष्ट्रीय वन्यजीव मंडळाच्या स्थायी समितीची मान्यता व मा.सर्वोच्च न्यायालयाने तद्नुरुप वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशांतील अटी बंधनकारक राहतील असे नमूद करण्यात आले आहे.

आणि ज्याअर्थी, भारत सरकारने या प्रस्तावावर नीट विचार करुन, राज्य शासनाने वन (संवर्धन), अधिनियम, १९८० च्या कलम-२ खाली सादर केलेल्या प्रस्तावास वरील अ.क्र.-३ अन्वये तत्वत: मंजूरी दिलेली आहे. ही मंजूरी भारत सरकारच्या दिनांक २३/०६/२०१६ रोजीच्या पत्रात नमूद केलेल्या अटींची पूर्तता प्रकल्प यंत्रणा करेल याच्या अधीन राहून प्रदान केली आहे;

आणि ज्याअर्थी, मा.उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ-नागपूर यांनी जनहित याचिका क्र.८८/२०१३ मधील दिनांक १४/११/२०१४ रोजीच्या आदेशामध्ये जनहित याचिका क्र.१२७७/२००० मा.उच्च न्यायालयात तसेच ॲप्लिकेशन क्र.१३५/२०१३ मा.राष्ट्रीय हरीत न्यायाधिकरणात प्रलंबित नसून, सदर दोन्ही प्रकरणातील यापूर्वीच्या सर्व आदेशांचे अवलोकन केले असता राष्ट्रीय राजमार्ग अथवा अशा प्रकारच्या प्रकल्पांची अंमलबजावणी करण्याकरीता मा.उच्च न्यायालय अथवा मा.राष्ट्रीय हरीत न्यायाधिकरणाच्या परवानगी आवश्यक असल्याचे कोठेही नमूद केलेले नाही, असे निर्देश दिले आहेत.

मा.राष्ट्रीय हरीत न्यायाधिकरणाने ॲप्लिकेशन नं.५७/२०१५ प्रकरणी दिनांक ०३/०९/२०१५ रोजी पारीत केलेल्या आदेशानुसार कर्नाळा पक्षी अभयारण्याच्या संरक्षित क्षेत्राच्या सीमेपासून १० किमीच्या आतील क्षेत्रावर काही अटींच्या अधीन राहून काम करण्यास परवानगी दिली आहे.

आणि ज्याअर्थी, पर्यावरण, वन व जलवायु परिवर्तन मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांनी वरील अ.क्र.४ अन्वये वन (संवर्धन) अधिनियम, १९८० अंतर्गत एकरेषिय प्रकल्पांना (linear projects) तत्वत: मान्यता मिळाल्यानंतर काही अटींच्या अधीन राहून काम सुरु करण्यास व झाडे तोडण्यास परवानगी देण्याबाबत सर्वसाधारण मान्यता दिली आहे;

आणि ज्याअर्थी, अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम मुंबई यांनी अटी पूर्तता अहवाल अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक व केंद्रस्थ अधिकारी, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना सादर केला आहे;

म्हणून आता महाराष्ट्र शासन याद्वारे असे निर्देश देत आहे की, प्रकल्प प्राधिकरण म्हणजेच मुख्य व्यवस्थापक (तांत्रिक) व प्रकल्प संचालक, भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण, पीआययु, चिंचपाडा-कळंबोली बायपास रोड, पनवेल यांना, कर्नाळा पक्षी अभयारण्यातून जाणारा राष्ट्रीय महामार्ग क्र.१७ चे मजबुतीकरण, रुंदीकरण व दुरुस्ती करण्यासाठी खाली दिलेल्या अनुसूचीमध्ये नमूद केलेली आणि प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे संदर्भ क्र.१ येथील पत्रानुसार सादर केलेल्या प्रकल्प प्रस्तावात अधिक तपशीलात नमूद केलेली १.६५ हे. वनजमिनीवर काम सुरु करण्यास व झाडे तोडण्यास परवानगी देत आहे. ही परवानगी भारत सरकारच्या दिनांक ०७/०५/२०१५ व महाराष्ट्र शासनाच्या दि.०१/०७/२०१५ रोजीच्या परिपत्रकातील अटी व शर्तीच्या पूर्ततेच्या अधीन राहून तसेच खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१) प्रकल्प यंत्रणेने वन (संवर्धन) अधिनियम, १९८० अंतर्गत तत्वत: मान्यता मिळालेल्या पत्रातील अटींची पूर्तता तात्काळ करुन अंतिम मान्यता प्राप्त होईल याबाबत दक्षता घ्यावी. तत्वत: मान्यता मिळालेल्या दिनांकापासून **एक वर्षाच्या** आत प्रकल्प यंत्रणा सर्व अटींचे तंतोतंत अनुपालन करेल याची अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम मुंबई याबाबतचा अहवाल वेळोवेळी अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा केंद्रस्थ अधिकारी, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना सादर करतील.

२) प्रकल्प यंत्रणेने प्रस्तावित वन जमिनीवर काम सुरु करण्यापूर्वी काम सुरु करण्यास तसेच झाडे तोडण्यास परवानगीसाठी संबंधित उप वनसंरक्षक (वन्यजीव) यांना कळविणे आवश्यक आहे. संबंधित उप वनसंरक्षक (वन्यजीव) यांनी स्थळ पाहणी करुन प्रस्तावित वनजमिनीवर वनभंग झाला आहे का ते पाहणे. तसेच वनभंग झाला असल्यास, कायद्यानुसार आवश्यक कार्यवाही करावी.

उपरोक्त अटींपैकी कोणत्याही अटींचे अनुपालन न केल्यास (non-compliance) संबंधित अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम मुंबई / उप वनसंरक्षक (वन्यजीव), वन (संवर्धन) अधिनियम, १९८० अंतर्गत दिनांक २५/१०/१९९२ रोजी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनातील कलम १.९ नुसार अहवाल राज्य शासनामार्फत अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, पश्चिम क्षेत्र, पर्यावरण, वन व जलवायु परिवर्तन मंत्रालय, भारत सरकार, क्षेत्रिय कार्यालय, पश्चिम-मध्य क्षेत्र, नागपूर यांना सादर करतील.

**अनुसूची**

| गावाचे नाव | तालुका | जिल्हा | गट क्र. | कंपार्टमेंट क्र. | वैधानिक दर्जा | क्षेत्र (हे.) |
|---|---|---|---|---|---|---|
| कहाळे | पनवेल | रायगड | १४९, १५७ | १३१, १३२, १३३ भाग | राखीव वन | १.६५ हे. |

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२१५१४५०५९१६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Virendra R Tiwari

Digitally signed by Virendra R Tiwari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f3a3acfdb19b03628a399a9a8c3aed13feb739d7b8bfdb181d6ec461d4505a7e, cn=Virendra R Tiwari
Date: 2016.12.15 14:56:25 +05'30'

(वीरेन्द्र तिवारी)
मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)

**प्रत- टप्पा-१ च्या मंजूरी आदेशासह वरील आदेश आपल्या वेबसाईटवर अपलोड करण्याच्या विनंतीसह :**

१. सचिव, पर्यावरण, वन व जलवायु परिवर्तन मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.

२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (केंद्रीय) , पर्यावरण, वन व जलवायु परिवर्तन मंत्रालय, क्षेत्रिय कार्यालय, पश्चिम-मध्य क्षेत्र, भारत सरकार, नागपूर.

**प्रत :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा केंद्रस्थ अधिकारी, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम मुंबई.
७. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कॅम्पा), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
८. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
९. मुख्य वनसंरक्षक (वन संवर्धन), नागपूर.
१०. मुख्य वनसंरक्षक (प्रा), ठाणे.
११. जिल्हाधिकारी, रायगड.
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड.
१३. उप वनसंरक्षक (वन्यजीव), ठाणे.
१४. मुख्य व्यवस्थापक (तांत्रिक) व प्रकल्प संचालक, भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण, पीआययु, चिंचपाडा-कळंबोली बायपास रोड, पनवेल .
१५. निवडनस्ती (फ-१०).

२. जिल्हाधिकारी, रायगड, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड व उप वनसंरक्षक (वन्यजीव), ठाणे यांना निर्देशित करण्यात येते की, वरील आदेशाची प्रत स्थानिक संस्था, पंचायत, नगरपालिका, नगरपरिषद आणि संबंधित शासकीय कार्यालयांचे प्रमुख यांना पाठविण्यात यावी. तसेच त्यांनी वरील आदेश त्यांच्या कार्यालयातील सूचना फलकावर तसेच वरील कार्यालय प्रमुखांच्या सूचना फलकावर सर्वसामान्य जनतेच्या माहितीसाठी प्रदर्शिले जातील याची खात्री करावी.

३. मुख्य व्यवस्थापक (तांत्रिक) व प्रकल्प संचालक, भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण, पीआययु, चिंचपाडा-कळंबोली बायपास रोड, पनवेल यांना निर्देशित करण्यात येते की, वन मंजूऱ्यांचे सर्व आदेश, सर्व्हे क्र., गट क्र. त्यांचे प्रत्येकाचे क्षेत्र आणि वैधानिक दर्जा इ. आणि केंद्र शासनाने मान्यतेच्या आदेशात घातलेल्या अटी व संरक्षित बाबी यांच्यासह एक स्थानिक भाषेतील व एक इंग्रजी भाषेतील प्रसिध्द अशा दोन दैनिक वृत्तपत्रात प्रसारित करावेत आणि त्याची प्रत उप वनसंरक्षक (वन्यजीव), ठाणे व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम मुंबई यांना देण्यात यावी.

४. स्थानिक स्वराज्य संस्था, पंचायत, नगरपालिका, नगरपरिषद आणि संबंधित शासकीय कार्यालयांचे प्रमुख यांना निर्देशित करण्यात येते की, आदेशांची प्रत मिळाल्यापासून ३० दिवसापर्यंत सदर आदेश सूचना फलकावर प्रदर्शित करावे.

**Issue of working permission for tree cutting and commencement of Work.**
**Diversion of 1.65 ha.of Reserved Forest land for widening, improvement and repair of existing National Highway No-17 in Karnala Bird Sanctuary in Raigad district.**
. .

**Government of Maharashtra**
**Revenue and Forest Department**
**Government Order No.FLD-1313/CR-141/F-10**
Mantralaya, Mumbai 400032.
Date: 15/12/2016

**Read:-**

1) Letter from Principal Chief Conservator of Forests (Head of Forest Force), Maharashtra State, Nagpur, no. No.Desk-17/NC/II/I.D.(50)/2758/12-13, dated 28/03/2013.
2) Letter from Government of Maharashtra of even no. dated 27/06/2013.
3) Letter from Ministry of Environment, Forests & Climate Change, Government of India, Regional Office (WCZ),Nagpur F.No.6-MHB-44/2013-BHO/576, dated 23/06/2016.
4) Letter from Ministry of Environment, Forests & Climate Change, Government of India, New Delhi F.No.11-306/2014-FC, dated 07/05/2015.
5) Circular from Government of Maharashtra No.FLD-2015/CR-77/F-10, dated 01/07/2015.
6) Letter from Additional Principal Chief Conservator of Forests and Nodal Officer, Maharashtra State, Nagpur, no. No.Desk-17/Nocel/RS-II/I.D.12211/(50)/1559/16-17, dated 23/11/2016.

**Order:-**

Whereas, the Principal Chief Conservator of Forests (Head of Forest Force) Maharashtra State, Nagpur, vide his letter referred at sr. no.1 above, has submitted a proposal to the State Government, which has been received from General Manager (Tech) and Project Director, NHAI, PIU Panvel, Dist. Raigad for diversion of 1.65 ha. of Reserved Forest land for widening, improvement and repair of existing National Highway No-17 in Karnala Bird Sanctuary;

AND whereas, Government of Maharashtra after careful scrutiny and consideration has recommended it to the Government of India to divert the 1.65 ha. of forest land for the above project under section 2 of Forest (Conservation) Act, 1980 vide letter referred at sr. no.2 above;

AND whereas, the project was recommended in 29th meeting of NBWL on 02/06/2015;

AND whereas, Hon'ble Supreme Court in its judgment dated 05/10/2015 in Writ Petition No.202/1995, has directed to consider all the matters for grant of permissions for implementation of projects in areas falling in National Parks/ Sanctuaries including rationalization of boundaries etc. by the Standing Committee of National Board for Wildlife (NBWL) on its own merits and in conformity with the orders & directions passed by the Hon'ble Supreme Court from time to time.

AND whereas, Government of India after due consideration vide its letter referred at sr. no. 3 above granted in-principle approval to above proposal submitted by Government of Maharashtra for diversion of forest land under section-2 of Forest (Conservation) Act, 1980. The said approval is subject to fulfillment of certain conditions by the User Agency mentioned in its letter dated 23/06/2016;

AND whereas, Hon'ble High Court-Mumbai, Bench-Nagpur has passed a judgment in PIL No.88/2013 on 14/11/2014 as follows:-

"We have perused the various orders passed by this court in W.P.No.1277/2000 and subsequently, the orders passed by the Green Tribunal, on the matter being transferred to it. Upon perusal of the orders, we have not come across any such order which can be said to have an effect that for undertaking the project like the expansion of National Highways, the permission of either this court or the learned Green Tribunal would be necessary. In any case, it is informed that proceedings before the learned Green Tribunal are concluded & nothing is pending before it."

AND whereas, Hon'ble National Green Tribunal in its Judgment dated 03/09/2015 in Application No.57/2015 has already accorded the permission for taking up projects & activities in forest areas within 10 KM from Protected Area of Karnala Bird Sanctuary subject to certain conditions.

AND whereas, Government of India, Ministry of Environment, Forests & Climate Change has given its general approval under the Forest (Conservation) Act, 1980 that for linear projects in-principle approval under Forest (Conservation) Act, 1980 may be deemed as working permission for tree cutting and commencement of work, subject to condition mentioned in Government of India’s letter referred at Sr.No.4 above;

AND whereas, the Additional Principal Chief Conservator of Forests (Wildlife), West Mumbai has submitted compliance of those conditions to Additional Principal Chief Conservator of Forests and Nodal Officer, Maharashtra State, Nagpur;

NOW, therefore, Government of Maharashtra hereby grants working permission for tree cutting and commencement of work for the proposal of diversion of 1.65 ha. of Forest land more specifically described in the proposal submitted vide letter mentioned at sr. no.-1 here in above from Principal Chief Conservator of Forests (Head of Forest Force), Maharashtra State, Nagpur and as per details given in the Schedule given below, subject to condition mentioned in Government of India’s letter referred at Sr.No.4 and Government of Maharashtra’s Circular Sr.No.5 above to the User Agency, i. e. General Manager (Tech) and Project Director, NHAI, PIU Panvel, Dist. Raigad for widening, improvement and repair of existing National Highway No-17 in Karnala Bird Sanctuary. This working permission for tree cutting and commencement of work is also subject to compliance of following conditions by the User Agency-

1. The User Agency shall comply with all the conditions stipulated in the in-principle approval and shall seek & obtain final / formal approval of

Government of India under Forest (Conservation) Act, 1980 for diversion of such forest land at the earliest and in any case not later than **one year** from the date of grant of in-principle order. The Additional Principal Chief Conservator of Forests (Wildlife), West Mumbai shall ensure the strict compliance of the conditions by the User Agency. Additional Principal Chief Conservator of Forests (Wildlife), West Mumbai will furnish the report in this regard to Additional Principal Chief Conservator of Forests and Nodal Officer, Maharashtra State, Nagpur from time to time.

2. The User Agency shall inform the Deputy Conservator of Forests (Wildlife), Thane by letter before date of commencement of work and tree cutting in proposed forest land. The concerned Deputy Conservator of Forests shall immediately inspect the proposed forest land and shall ensure that there is no violation of any law. In case of violation, the Deputy Conservator of Forests (Wildlife), Thane shall take actions as per the law.
3. In case of non-compliance of any of the above conditions, the Additional Principal Chief Conservator of Forests (Wildlife), West Mumbai / Deputy Conservator of Forests (Wildlife), Thane shall report through the State Government to Additional Principal Chief Conservator of Forests, Government of India, Ministry of Environment, Forests & Climate Change, Regional Officer (WCZ), Nagpur as per procedure laid down in the clause 1.9 of guidelines on 25/10/1992 under the Forest (Conservation) Act, 1980.

**SCHEDULE**

| Village | Taluka | Dist. | Gut No. | Compt. No. | Legal Status | Area in Ha. |
|---|---|---|---|---|---|---|
| Kahale | Panvel | Raigad | 149, 157 | 131, 132, 133pt | Reserved Forest | 1.65 Ha. |

This Government Order of Maharashtra Government is available on its website www.maharashtra.gov.in. Reference no. for this is 201612151450591619. This order has been signed digitally.

By order and in the name of the Governor of Maharashtra.

Virendra R Tiwari

Digitally signed by Virendra R Tiwari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f3a3acfdb19b03628a399a9a8c3aed13feb739d7b8bfdb181d6ec461d4505a7e, cn=Virendra R Tiwari
Date: 2016.12.15 14:56:43 +05'30'

**( Virendra Tiwari )**
**Chief Conservator of Forests (Mantralaya)**

**Copy forwarded with request to upload this order on their website along with the Stage-I clearances to:**

1. Secretary, Ministry of Environment, Forests & Climate Change, Government of India, New Delhi.
2. Additional Principal Chief Conservator of Forests (Central), Ministry of Environment, Forests & Climate Change, Government of India, Regional Office (WCZ), Nagpur.

**Copy to:-**

1. Principal Chief Conservator of Forests (HoFF), Maharashtra State, Nagpur.
2. Principal Chief Conservator of Forests (Wildlife), Maharashtra State, Nagpur.
3. Principal Secretary (Roads), Public Works Department, Mantralaya, Mumbai.
4. Principal Secretary, Tribal Development Department, Mantralaya, Mumbai.
5. Additional Principal Chief Conservator of Forests and Nodal Officer, Maharashtra State, Nagpur.
6. Additional Principal Chief Conservator of Forests (CAMPA), Maharashtra State, Nagpur.
7. Additional Principal Chief Conservator of Forests (Conservation), Maharashtra State, Nagpur.
8. Additional Principal Chief Conservator of Forests (Wildlife), West Mumbai.
9. Chief Conservator of Forests (Forest Conservation), Nagpur.
10. Chief Conservator of Forests (Territorial), Thane.
11. Collector, Raigad.
12. Chief Executive Officer, Zilla Parishad, Raigad.
13. Deputy Conservator of Forests (Wildlife), Thane.
14. General Manager (Tech) and Project Director, NHAI, PIU Panvel, Dist. Raigad.
15. Select File, Desk F-10.

2. Collector, Raigad, Chief Executive Officer, Zilla Parishad, Raigad and Deputy Conservator of Forests (Wildlife), Thane are hereby directed to forward the copy of this order to concerned Heads of Local Bodies, Panchayats, Municipal Bodies in addition to the relevant offices of the Government and they shall also ensure the display of this order on their notice board as well as on the notice board of local self-government bodies for the information of general public.

3. General Manager (Tech) and Project Director, NHAI, PIU Panvel, Dist. Raigad is hereby directed that they should publish the entire order of working permission for tree cutting and commencement of work granted in verbatim along with the details of Survey No., Gut No., area and legal status of each Survey, Gut No.etc. along with the conditions and safe guards imposed by the Central Government while granting working permission for tree cutting and commencement of work in two widely circulated daily newspapers, one in vernacular language and other in English language and submit the copies of newspapers to Additional Principal Chief Conservator of Forests (Wildlife), West Mumbai & Deputy Conservator of Forests (Wildlife), Thane.

4. Heads of Local Bodies, Panchayats and Municipal Bodies in addition to the relevant offices of the Government are hereby directed to display the same on their notice board for 30 days from the date of receipt for the information of general public.